मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब
संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या...

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन आदेश क्रमांकः एमसीओ २०१५/प्र.क्र. ३१५/नवि १४
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० ऑक्टोबर, २०१५

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार खाली नमुद केलल्या नगरपरिषद मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असुन त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| मुख्याधिकारी गट-अ | | | |
| १ | श्री. ए. जी. तडवी, जिल्हा प्रशासन अधिकारी, अमरावती | जिल्हा प्रशासन अधिकारी, रायगड | वैयक्तीक विनंती विचारात घेवून वैद्यकीय कारणास्तव |
| २ | श्री. रविंद्र पाढंरे, जिल्हा प्रशासन अधिकारी, यवतमाळ | जिल्हा प्रशासन अधिकारी, नागपूर | वैयक्तीक विनंती विचारात घेवून शासन आदेश क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.२८०/नवि-१४, दि.२७.०८.२०१५ अन्वये दर्शविण्यात आलेल्या पदस्थापनेत अशंतः बदल करुन. |
| ३ | श्री. डी. पी. मोरे, जिल्हा प्रशासन अधिकारी, पुणे | सह व्यवस्थापकीय संचालक, पुणे महानगर परिवहन मंडळ, पुणे | प्रशासकीय कारणास्तव अधिनियम २००५ मधील कलम ४(४) (दोन) व ४(५) नुसार श्री.प्रविण अष्टीकर यांच्या जागी. |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| **मुख्याधिकारी गट-ब** | | | |
| १ | श्रीमती अलका खैरे, मुख्याधिकारी, बिलोली नगरपरिषद, जि.नांदेड (रुजू नाही) | सहायक संचालक,गट-ब, विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग | वैयक्तीक विनंती विचारात घेवून शासन आदेश क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१६६/नवि-१४, दि.२९.०८.२०१५ अन्वये दर्शविण्यात आलेल्या पदस्थापनेत अशंतः बदल करुन. |
| २ | श्रीमती विशाखा मोटघरे, मुख्याधिकारी, इगतपूरी नगरपरिषद, जि.नाशिक | मुख्याधिकारी, एरंडोल नगरपरिषद, जि.जळगाव | प्रशासकीय कारणास्तव शासन आदेश क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१६६/नवि-१४, दि.२९.०८.२०१५ अन्वये दर्शविण्यात आलेल्या पदस्थापनेत अशंतः बदल करुन. |
| ३ | श्री. मंगेश खवले, मुख्याधिकारी चांदूररेल्वे नगरपरिषद, जि. अमरावती | मुख्याधिकारी ब्रम्हपूरी नगरपरिषद, जि. चंद्रपूर | सद्यपदावरुन बदली करण्याची विनंती विचारात घेवून, बदली अधिनियम २००५ मधील कलम ४(४) (दोन) व ४(५) नुसार |

०२. शासन आदेश क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१६६/नवि-१४, दि.२९.०८.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आलेले श्री. सिध्दार्थ मेश्राम, मुख्याधिकारी, नरखेड नगरपरिषद, जि.नागपूर व श्रीकृष्णा निपाणे, मुख्याधिकारी, तेल्हारा नगरपरिषद, जि.अकोला यांच्या बदलीच आदेश **रद्द करण्यात** येत आहेत.

०३. श्री.प्रविण अष्टीकर, सह व्यवस्थापकीय संचालक, पुणे महानगर परिवहन मंडळ, पुणे यांच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

०४. सर्व संबंधित जिल्हाधिकारी/नियंत्रक अधिकाऱ्यांनी पर्यायी अधिकारी रुजू होण्याची प्रतिक्षा न करता त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या व बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, संबंधित मुख्याधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्याबाबतचा अहवाल दि. २३.१०.२०१५ पर्यंत शासनास ई-मेल द्वारे urbandevp14@gmail.com या ई-मेल पत्त्यावर न चुकता सादर करावा. तसेच सर्व संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील मुख्याधिकाऱ्यांच्या बदलीमुळे रिक्त रहाणाऱ्या नगरपरिषदांच्या मुख्याधिकारी पदाचा अतिरीक्त कार्यभार जवळपासच्या नगरपरिषद मुख्याधिकाऱ्याकडे किंवा महसुल अधिकाऱ्यांकडे सुपुर्द करुन संबंधित मुख्याधिकाऱ्यास कार्यमुक्त करावे.

०४. तसेच या आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्या रद्द करणे किंवा त्यात बदल करणे या साठी राजकीय दडपण/ दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित मुख्याधिकाऱ्यांविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरू करण्यात येईल.

०५. सर्व संबंधित मुख्याधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या नविन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासन सादर करावा.

०६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२०१३०८४४८०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.10.20 13:11:56 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक.
३. जिल्हाधिकारी,अमरावती/रायगड/यवतमाळ/ नागपूर/पुणे/नांदेड/नाशिक/ जळगाव/चंद्रपूर/अकोला.
४. व्यवस्थापकीय संचालक, पुणे महानगर परिवहन मंडळ, पुणे.
५. नगराध्यक्ष, नगपरिषद बिलोली, जि.नांदेड/ इगतपूरी, जि.नाशिक/ चांदुररेल्वे, जि.अमरावती/ नरखेड, जि.नागपूर
६. सर्व संबंधित मुख्याधिकारी

**प्रतिलिपि,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. सर्व संबंधित सह/उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सर्व संबंधित कार्यासन अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवड नस्ती/नवि १४